# आधी केले, मग सांगितले.

## युती शासनाची चार यशस्वी वर्षे

● रस्ते : समर्थ महाराष्ट्राचे बलस्थान : ९४ टक्के खेडी बारमाही रस्त्यांनी जोडली. मुंबईत ५५ उड्डाणपुलांचे जाळे आणि शहरांना जोडणाऱ्या चार द्रुतगती मार्गांचे काम वेगाने प्रगतीपथावर.

● ३३.४९ लाख हेक्टर अतिरिक्त सिंचन क्षमतेची निर्मिती. त्यासाठी पाच सिंचन विकास महामंडळांची स्थापना.

● 'टँकरमुक्त महाराष्ट्र' अभियान जोराने सुरु. अकरा जिल्हे टँकरमुक्त. १७,००० पेक्षा अधिक खेड्यांना पाणी पुरवठ्यासाठी १४७३ कोटी रुपये खर्च.

● विपुल ऊर्जा निर्मिती : देशात महाराष्ट्र आघाडीवर, पारंपरिक व अपारंपरिक ऊर्जा प्रकल्पांद्वारे वीज निर्मिती क्षमतेत वाढ. शेतकऱ्यांना वीज बिलाच्या थकबाकीत भरघोस सूट.

● आशियात सर्वप्रथम : कोयना जलाशयात 'लेक टॅपिंग'चा यशस्वी प्रयोग. आशिया खंडातील या अभूतपूर्व प्रयोगामुळे १००० मे. वॅ. विजेची अतिरिक्त निर्मिती शक्य.

● 'ॲडव्हान्टेज महाराष्ट्र'चे यशस्वी आयोजन. औद्योगिक क्षेत्रातील एकूण राष्ट्रीय गुंतवणुकीच्या ११.०९ टक्के गुंतवणूक एकट्या महाराष्ट्रात.

● १००० कोटी रुपयांचा भार सोसून तांदूळ, गहू, डाळ, साखर आणि गोडेतेल या वस्तूंचे भाव पाच वर्षांसाठी स्थिर. दारिद्र्यरेषेखालील लोकांना दोन रुपये किलो दराने गहू आणि तांदूळ.

● ग्रामीण भागातील महिलांसाठी १२ लाखांहून अधिक स्वच्छतागृहांचे बांधकाम पूर्ण. देशातील एकूण ग्रामीण स्वच्छतागृहां-पैकी ४० टक्के एकट्या महाराष्ट्रात.

● जीवनदायी आरोग्य योजना : हृदय-शस्त्रक्रिया, मूत्रपिंड प्रत्यारोपण यासारख्या रोगांवरील उपचारांसाठी आर्थिक मदत देऊन गरिबांना नवीन जीवनदान.

● नवीन पिढीवर लढाऊ बाणा, देशाभिमान आणि शिस्तीचे संस्कार व्हावेत यासाठी प्रत्येक जिल्ह्यात सैनिकी शाळा.

● माहिती-तंत्रज्ञान वर्ष साजरे करीत महाराष्ट्राची नवीन सहस्त्रकाकडे झेप.



मा. मुख्यमंत्री
श्री. नारायण राणे



मा. उपमुख्यमंत्री
श्री. गोपीनाथ मुंडे



# महाराष्ट्र शासन

गतिमान शासन

(महाराष्ट्र परिचय केन्द्र-गोवा, माहिती व जनसंपर्क महासंचालनालयातर्फे प्रसृत.महाराष्ट्र दिन-'९९)